**राज्यातील शासनमान्यता प्राप्त खाजगी विनाअनुदानीत व कायम विनाअनुदानीत संस्थांमधील व्यावसायिक अभ्यासक्रमांमध्ये प्रवेश घेणाऱ्या अनुसूचित जमातीच्या <u>विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक शुल्काच्या प्रतिपूर्तीबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्रमांक : व्यअप्र-२०१०/प्र.क्र.२५४/का.१२

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : २७ डिसेंबर, २०१०.

<u>वाचा</u> :- शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग क्र.व्यअप्र-२००९/प्र.क्र.९४/का.१२,दि.२८ ऑगस्ट, २००९.

<u>**प्रस्तावना**</u> :-राज्यातील शासन मान्यताप्राप्त खाजगी विना अनुदानित व कायम विना अनुदानित शिक्षण संस्थांमध्ये व्यावसायिक अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेणा-या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्ती या योजनेस प्रथम सन २००६-०७ या शैक्षणिक वर्षाकरीता मंजूरी देण्यात आली होती. त्यानंतर सन २००७-०८, २००८-०९ व सन २००९-१० या वर्षात सदर योजना राबविण्यास मंजूरी देण्यात आली. तथापि, सन २०१०-११ या वर्षासाठी सदर योजनेस मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

<u>**शासन निर्णय**</u> : राज्यातील शासन मान्यताप्राप्त खाजगी विना अनुदानित व कायम विना अनुदानित शिक्षण संस्थांमध्ये प्रवेश घेतलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांची सन २०१०-११ या वर्षासाठी शिक्षण शुल्क समिती, प्राधिकरण किंवा परिषदेने निर्धारित केलेल्या दराप्रमाणे शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्कांची प्रतिपूर्ती करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सदर योजना सन २००६-०७, सन २००७-०८, सन २००८-०९ , सन २००९-१० व सन २०१०-११ या शैक्षणिक वर्षात खालील व्यावसायिक अभ्यासक्रमात प्रवेश घेतलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांसाठी अभ्यासक्रमाच्या पूर्ण कालावधीपर्यंत लागू राहील. **तथापि, विद्यार्थी अनुत्तीर्ण झाला तर शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्कांची प्रतिपूर्ती करण्यात येणार नाही.**

अ) आरोग्य विज्ञान पदवी अभ्यासक्रम (वैद्यकीय, दंत, होमिओपॅथी, युनानी, आयुर्वेद, भौतिकोपचार, व्यवसायोपचार व नर्सिंग)

ब) उच्च व तंत्र शिक्षण विभागांतर्गत असणारे अभ्यासक्रम :

| पदविका | पदवी | पदव्युत्तर पदवी |
|---|---|---|
| अभियांत्रिकी | अभियांत्रिकी | एम.बी.ए. |
| औषधनिर्माणशास्त्र | औषधनिर्माणशास्त्र | एम.सी.ए. |
| एच.एम.सी.टी. | एच.एम.सी.टी. | -- |
| -- | वास्तुशास्त्र | -- |

क) कृषी, पशुसंवर्धन व दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभागांतर्गत पदविका, पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रम तसेच बी.एस.सी. (जैव तंत्रज्ञान).

ड) इ.१० वी ची शालांत परिक्षा (एस.एस.सी./सी.बी.एस.ई. व तत्सम) उत्तीर्ण झाल्यानंतरचे महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाचे पूर्ण वेळ अभ्यासक्रम (फुलटाईम कोर्स).

३. या योजनेचा लाभ विनाअनुदानीत तसेच कायम विनाअनुदानीत महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांना खाली नमूद केलेल्या अभ्यासक्रमांसाठीही पुढील अटी व शर्तींच्या अधिन राहून देण्यात येईल :-

अ) <u>अभियांत्रिकी अभ्यासक्रम</u> :- शासनाच्या सामायिक प्रवेश परिक्षेद्वारा (सी.ई.टी.) प्रवेश घेतलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना लागू राहील. सदर योजनेचा लाभ संस्था स्तरावर करण्यात येत असलेल्या (Institutional Level Quota) परिक्षेद्वारे प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांना लागू राहणार नाही.

ब) <u>आरोग्य विज्ञान अभ्यासक्रम</u> :- शासनाच्या सामायिक प्रवेश परिक्षेद्वारा (सी.ई.टी.) प्रवेश घेतलेल्या तसेच खाजगी विनाअनुदानीत महाविद्यालयाच्या वतीने तसेच असोसिएशनमार्फत घेण्यात येणाऱ्या सामायिक प्रवेश परिक्षेद्वारा (Associate CET) आणि इ.१२ वी च्या गुणांच्या आधारे काही अभ्यासक्रमांसाठी (उदा.नर्सिंग) प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांना लागू राहील. एकूण प्रवेश क्षमतेच्या १५% जागा अनिवासी भारतीयांकरिता राखून ठेवल्या जातात. सदर व्यवस्थापन कोटयामध्ये प्रवेशित झालेल्या विद्यार्थ्यास तसेच अभिमत विद्यापीठात प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांना या योजनेचा लाभ कोणत्याही परिस्थितीत अनुज्ञेय राहणार नाही.

क) <u>कृषी, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय व मत्स्यव्यवसाय अभ्यासक्रम</u> :- काही अभ्यासक्रमासाठी शासनाची सामायिक परिक्षा (सी.ई.टी.) घेण्यात येत नाही. त्यावेळी इ. १२ वी च्या गुणांच्या आधारावर अशा अभ्यासक्रमांसाठी प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांना ही योजना लागू राहील.

४. शालेय शिक्षण विभागामार्फत चालविण्यात येणा-या मान्यताप्राप्त खाजगी विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित, अध्यापक विद्यालय (डी.एड) व उच्च व तंत्र शिक्षण विभागामार्फत चालविण्यात येणा-या अध्यापक महाविद्यालयांमध्ये (बी.एड) शिक्षण घेणा-या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शिक्षण शुल्क, परिक्षा शुल्क व इतर शुल्काची प्रतिपूर्ती सध्या विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित डी.एड व बी.एड च्या अभ्यासक्रमांना शासकीय दराप्रमाणे करण्यात येते. तेथे ती पुढे चालू ठेवण्यात यावी.

५. आरक्षणाचा लाभ न घेता, गुणवत्तेनुसार खुल्या गटातील जागांवर प्रवेश घेतलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांसाठी सुध्दा सदरची योजना लागू राहील. तसेच एक किंवा दोन विषयांमध्ये अनुत्तीर्ण होऊन पुढच्या वर्गात ए.टी.के.टी.द्वारे प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांनाही अनुज्ञेय राहील.

६. सदर योजनेचा लाभ घेणाऱ्या सर्व अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांनी वैधता प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. त्याशिवाय शैक्षणिक शुल्काची प्रतिपूर्ती करण्यात येवू नये.

७. ही योजना अनिवासी भारतीयांकरिता (N.R.I.) विहीत कोटयात व्यवस्थापनामार्फत देण्यात येणाऱ्या प्रवेशार्थीस व अभिमत विद्यापीठात प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांना लागू राहणार नाही. त्याचप्रमाणे ही सवलत अनुत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना लागू राहणार नाही.

८. या बाबीवर होणारा खर्च मागणी क्रमांक टी-५, मुख्य लेखाशिर्ष २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - राज्य योजनांतर्गत योजना - (०१)(३३) वैद्यकीय व तत्सम अभ्यासक्रमासाठी अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या(२२२५ ३५२ ९) ३४, शिष्यवृत्त्या व विद्यावेतने या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

९. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashrtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र.२०१०१२२४१९५०१५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( कैलास द. भंडलकर )
शासनाचे उप सचिव

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मुख्य सचिव, यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, सामाजिक न्याय, व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
कृषि, पशुसंवर्धन, दुगधव्यवसाय व मत्स्यविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, शालेय शिक्षण विभाग , मंत्रालय, मुंबई
कुलगुरु, सर्व विद्यापीठे
महासंचालक , माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपूर, अमरावती
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास, प्रकल्प.
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई.
निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
निवडनस्ती.

---